**सन २०२४-२५ करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना-प्रति थेंब अधिक पीक योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता रु.१०.४० कोटी निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. राकृवि-०६२४/प्र.क्र.१४१/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ०९ जुलै, २०२४

<u>संदर्भ</u> :

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४.
२. राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया अंतर्गत राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०३ मे,२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३. कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्र. राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे, दि. १६ मे, २०२४.
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२४ आरकेव्हीवाय/१, दि. ०३ जून, २०२४.
५. आदिवासी विकास विभगाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि. ०१ जुलै,२०२४.

**<u>प्रस्तावना :</u>**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना - प्रती थेंब अधिक पीक ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. या योजनेकरिता केंद्र शासनाने सन २०२४-२५ साठी केंद्र हिश्श्याचा रु.२६७.०० कोटी व त्या समरूप राज्य हिस्याचा ₹ १७८ कोटी असा एकूण रु.४४५ कोटीचा नियतव्यय मंजूर केलेला आहे.

कृषि विभागाच्या दि. १६ मे, २०२४ (संदर्भ क्र.३) रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या सन २०२४-२५ करिता रु.६६७.५० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन २०२४-२५ मध्ये प्राप्त पहिल्या हप्त्यात अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्यापोटी रु. ६.२४ कोटी निधी प्राप्त झाला असून त्या समरूप राज्य हिश्श्याचा रु. ४.१६ कोटी निधी असा एकूण रु.१०.४० कोटी निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना प्रति थेंब अधिक पीक या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी **अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्याचा रु. ६.२४ कोटी (रुपये सहा कोटी चोवीस लक्ष फक्त) आणि राज्य हिश्श्याचा रु. ४.१६ कोटी (रुपये चार कोटी सोळा लक्ष फक्त) असा एकूण रु.१०.४० कोटी निधी (रुपये दहा कोटी चाळीस लक्ष फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रु. १०.४० कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच सदर निधी राष्ट्रीय कृषि विकास योजना-प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा -

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र.टी-५,<br>२४०१ पीक संवर्धन.<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१) जनजाती क्षेत्र उपाययोजना,<br>(०१) (२७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक<br>(सुक्ष्म सिंचन) (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६०%)<br>**(२४०१ A६१९), ३३ अर्थसहाय्य.** | मागणी क्र. टी-५,<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१) जनजाती क्षेत्र उपाययोजना,<br>(०१) (१२) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक<br>(सुक्ष्म सिंचन) (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>**(२४०१ A४६८), ३३ अर्थसहाय्य.** |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची निवड महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.

५. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१/०४/२०२४ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार व आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध केला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०९१५५१३१७८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.07.09 16:02:53 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (आदिवासी विकास विभाग), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
८. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपुर
९. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपुर
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१२. वित्त विभाग (कार्या. व्यय-१४ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती.